अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२०.

वाचा:-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-०१/२००१/प्र.क्र.४३/पोल-१अ, दि. ११.०५.२००१.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१अ, दि. २२.१०.२००९.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१७१६/प्र.क्र.१९७ (१)/पोल-१अ, दि. ०७.०६.२०१६.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.०७.१०.२०१९
५) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ पोलीस अधीक्षक, वि. कृ.द. /मुदतवाढ/३७/२०१७, दि.२३.०१.२०२०.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**शासन निर्णय:-**

राज्य पोलीस दलाच्या पुनर्रचनेअंतर्गत उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक ११.०५.२००१ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधीक्षक/पोलीस उपआयुक्त या संवर्गात ३० पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद ३० पदांपैकी अ.क्र.१३ ते १९ येथे नमूद अतिरिक्त समादेशक, राज्य राखीव पोलीस बल या ७ पदांचे उपरोक्त संदर्भाधिन क्र.२ येथे नमूद दिनांक २२.१०.२००९ च्या शासन निर्णयान्वये फेरवाटप करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर फेरवाटप केलेल्या ७ पदांपैकी अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र. ०४ येथे नमूद दिनांक ०७.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद दिनांक २३.०१.२०२० च्या पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती)

यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास दिनांक ०१.०३.२०२० पासून पुढील मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

२. सदर पद ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आले होते ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. यास्तव, उक्त अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास **दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

२) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

३) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.६ येथील दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. आकृतीबंध निश्चित करावयाची कार्यवाही उशिरात उशिरा दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत पुर्ण करावयाची आहे. ही बाब विचारात घेता दिनांक ३१.०८.२०२० अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. सदरचा खर्च "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन-पोलीस निरीक्षणालये" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१६१२२३०६३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.03.16 12:26:04 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, विशेष कृती दल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. गृह विभाग, कार्यासन (पोल-१अ).
८. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
९. निवड नस्ती (पोल-३).